**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षांसाठी अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना नामांकित निवासी इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये शिक्षण देणे लेखाशिर्ष (२२२५ सी ९९९)**

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२ /प्र.क्र. २/ कार्यासन ६

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १७ ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३. दि.१२.०४.२०२३.

२) आदिवासी विकास विभाग, नस्ती क्र.बजेट-१८२३/प्र.क्र.४९/कार्या-१२.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना नामांकित निवासी इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींमधून वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध असलेला निधी वितरणाची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना नामांकित निवासी इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित निधीमधून विभागामार्फत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध असलेला २० टक्के मर्यादेत रु.६०.०० कोटी इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु. कोटीत)**

| योजना | लेखाशीर्ष | बाब | सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पित तरतूद | सदर शा. नि. अन्वये वितरीत येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना नामांकित निवासी इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये शिक्षण देणे | २२२५सी ९९९ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ३००.०० | ६०.०० |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.६०.०० कोटी (अक्षरी रुपये साठी कोटी फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना** अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकातील तरतुदींस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०८०४१८४९५१७३२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2023.08.17 16:49:24 +05'30'

**( किरण कि. पवार )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र राज्य विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
८. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११. सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.